जलसंपदा विभागांतर्गत संशोधन व विकास क्षेत्रात काम करणा-या विविध कार्यालयाची पुर्नरचना व कार्यात्मक बदलाचे नवीन धोरण.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. मेरीबै-०११५/प्र.क्र.०१/२०१५/जसं (धोरण)**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ जानेवारी, २०१५

<u>वाचावे</u> : १) महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शा.नि. संकीर्ण-१०९२/सीआर-८०६/व्यय-६, मंत्रालय, मुंबई, दि. १५/१०/१९९२.
२) महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग, शा. नि.जसंवि-पुर्नरचना/२००९/(१६/०९)/ जसं (आस्था),दि.१२/१०/२०१०.

<u>पार्श्वभूमी</u>

जलसंपदा विभागातील वरिष्ठ अधिका-यांची कार्यशाळा औरंगाबाद येथे दि. ३१/५/२०१३ व दि. १/६/२०१३ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर कार्यशाळेत विभागाचे Vision -२०२० निश्चित करण्यासाठी व विभागामध्ये सुधारणा घडवून आणण्याचे दृष्टीने व्यापक चर्चा झाली. शासनाने शासन परिपत्रक क्र. ई-प्रशा-१०१३/(१९६/१३)/ल.पा. १, दि. १२ जून, २०१३ अन्वये वरिष्ठ अधिका-यांचे आठ अभ्यासगट गठीत केले होते. या अभ्यास गटापैकी श्री. वि. मा. कुलकर्णी, मुख्य अभियंता यांचे अध्यक्षतेखालील अभ्यास गटाने 'जलसंपदा विभागातील संशोधन व विकास या विषयावर प्रधान सचिव, जलसंपदा विभाग यांना अभ्यासपूर्ण सादरीकरण केलेले होते. सदर सादरीकरणामध्ये कालानुरुप जलसंपदा विभागासमोरील आव्हाने पेलण्यासाठी तसेच विभागाने ठरविलेली उद्दिष्टे साध्य करणेसाठी संशोधन व विकास क्षेत्रात काम करणा-या विविध कार्यालयाची पुनर्रचना करणेची तसेच काही कार्यालयांचे सध्याचे कार्यप्रकारात बदल करण्याची शिफारस या अभ्यासगटाने केलेली होती. या शिफारसीच्या अनुषंगाने जलसंपदा विभागातील संशोधन व विकास क्षेत्रात काम करणा-या विविध कार्यालयांची पुर्नरचना करण्याचा तसेच या कार्यालयांवर काही नवीन जबाबदा-या देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता. या पार्श्वभूमीवर पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करणेत येत आहेत.

**शासन निर्णय:-**

१) मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक हे यापुढे मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक म्हणून कार्यरत राहतील. त्यांचे नियंत्रणाखाली खालील अधिकारी राहतील:-

१.१) अधीक्षक अभियंता (द्वारे) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक
१.२) अधीक्षक अभियंता (माती धरण)मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक
१.३) अधीक्षक अभियंता (दगडी धरण),मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ),नाशिक.

१.४) सध्या कार्यरत अधीक्षक अभियंता (वि.गृ.) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक व त्याचे अंतर्गत विभाग यापुढे अधीक्षक अभियंता(उपसा सिंचन योजना) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ) नाशिक म्हणून कार्यरत राहतील.

१.५) याव्यतिरिक्त सध्या मुख्य अभियंता (स्थापत्य जलविद्युत) पुणे यांचे नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता,कोयना संकल्पचित्र मंडळ,पुणे व त्या अंतर्गत विभाग अधीक्षक अभियंता (विद्युतगृहे) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ) म्हणून पुणे मुख्यालयीच कार्यरत राहतील. हे मंडळ संपूर्ण राज्यातील जलविद्युत गृहाचे संकल्पचित्राचे काम करेल.

१.६) याव्यतिरिक्त नव्याने प्रस्तावित अधीक्षक अभियंता (कालवा) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ),नाशिक हे व त्यांचे नियंत्रणाखालील विभाग सुध्दा मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक यांचे नियंत्रणाखाली राहील. याबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

१.७) सदर अधीक्षक अभियंता(कालवा), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक हे कार्यालय कार्यरत झालेनंतर सध्या अधीक्षक अभियंता (द्वारे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत कार्यकारी अभियंता(कालवा बांधकामे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक हे अधीक्षक अभियंता (कालवा), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहतील.

मुख्य अभियंता मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना यांनी मऊ पायावरील बॅरेजेस, बॅरेजवरील प्रीस्टेस्ड ब्रीजेस, बंदिस्त नलिका वितरण, सुक्ष्म सिंचन, जुन्या धरणांचे तसेच कालव्यावरील बांधकामाची पुन:स्थापना (Rehabilitation & Retrofitting Techniques) Hydraulic Hoist इ. घटकांची संकल्पने विकसित करावीत. तसेच अद्यावत संकल्पन पध्दती, नव-नवीन बांधकाम साहित्य, नावीन्यपूर्ण बांधकाम पध्दती विचारात घेवून तसेच केंद्रीय जल आयोगाचे व अन्य राज्यांचे संकल्पचित्र संघटनांशी समन्वय साधून CDO Code of practice अद्यावत करण्याचे काम हाती घ्यावे.

२) महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक हे कार्यालय अधीक्षक अभियंता,महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी,नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहील. तसेच अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी,नाशिक हे यापुढे महासंचालक, मेरी,.नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहतील.

प्रशिक्षण प्रबोधिनी अंतर्गत विषयांची निवड क्षेत्रिय गरज विचारात घेवून करावी. प्रशिक्षणाबरोबरच क्षेत्रिय भेटीवर भर द्यावा. मेरी व मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, धरण सुरक्षा संघटना, जलविज्ञान इ.कार्यालयांनी विकसित केलेले ( नवीन शोध, संकल्पनातील संकल्पना, नवीन कार्यपध्दती ) लवकरात लवकर क्षेत्रिय अभियंत्यापर्यंत पोहचणे बाबत प्रयत्नशील रहावे.

तांत्रिक क्षमता बांधणी बरोबरच अभियंत्यांना जलसंपदा विभागाची उदिदष्टे साध्य करण्यासाठी प्रेरित करावे.

३) अधीक्षक अभियंता,धरण सुरक्षितता संघटना (DSO),नाशिक व त्यांचे अधिपत्याखालील सर्व आस्थापना यापुढे मुख्य अभियंता (नियोजन व जलविज्ञान) यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहील. सध्या अधीक्षक अभियंता, मेरी, नाशिक अंतर्गत कार्यरत भूकंप उपकरणे कक्ष व भूकंप आधार सामुग्री पृथ:करण

कक्ष हे यापुढे अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता, नाशिक यांचे अंतर्गत उपकरणे संशोधन विभाग चे नियंत्रणाखाली कार्यरत राहतील.

४) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था अंतर्गत सध्या कार्यरत जलगती संशोधन क्र. १ विभाग हा यापुढे मुख्य अभियंता (नियोजन व जलविज्ञान) यांचे अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ, नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहील. सदर विभाग यापुढे सध्याच्या कामाव्यतिरीक्त गणितीय प्रतिकृती ( Mathematical modelling ) वर जास्त भर देईल. Surge Analysis, Water Hammer Effect, Dam Break Analysis, Flood Zoning, Back water study,इत्यादीबाबतचे Mathematical Modelling ची कामे करेल. त्याचप्रमाणे सध्या अधिक्षक अभियंता (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत जलनियोजन विभाग हा सुध्दा यापुढे मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान यांचे अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ, नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहील.

मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान यांनी त्यांचे सध्याचे कामाव्यतिरीक्त हवामान बदलाचे राज्यातील सिंचन प्रकल्पावरील अपेक्षित परिणाम हा अभ्यासही हाती घ्यावा.

५) सध्या अधीक्षक अभियंता,मेरी,.नाशिक यांचे नियंत्रणाखालील संरचनात्मक संशोधन व पदार्थ विज्ञान विभाग, नाशिक हा विभाग यापुढे मुख्य अभियंता (नियोजन व जलविज्ञान)) अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ,नाशिक यांचे नियंत्रणाखाली जलसंपदा विभागाचा एमआयएस कक्ष म्हणून कार्यरत राहील. सदर कक्ष जलसंपदा विभागाची सर्व आकडेवारी संकलित करुन आवश्यकतेनुसार तिचे पृथ:करण करुन सर्व संबंधितांना पुरविण्याचे काम करेल. सदर कार्यालय सध्या करत असलेले पाणी चाचण्याचे काम जलविज्ञान प्रकल्पांतर्गत प्रयोगशाळेकडे वर्ग करणेत यावे. तसेच त्यांच्याकडील खडक चाचणी व लोह चाचणी हे काम सामग्री चाचणी विभाग यांचेकडे वर्ग करण्यात यावे.

६) पुणे येथील सध्या कार्यरत मुख्य अभियंता(स्थापत्य जलविद्युत) हे यापुढे त्यांचे सध्याचे कार्यभाराव्यतिरिक्त राज्यातील जलसंपदा विभागाचे बांधकामाचे गुणनियंत्रण प्रमुख म्हणून काम पाहतील. यासाठी सध्या गुणनियंत्रणाचे काम पाहणारी खालील मंडळ कार्यालये व त्यांचे अंतर्गत सर्व आस्थापना मुख्य अभियंता(स्थापत्य ) जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण यांचे नियंत्रणाखाली आणण्यात येत आहे:-

६.१) अधीक्षक अभियंता,गुण नियंत्रण मंडळ,पुणे

६.२) अधीक्षक अभियंता,गुण नियंत्रण मंडळ,नागपूर

६.३) अधीक्षक अभियंता,गुण नियंत्रण मंडळ,औरंगाबाद

७) सध्या कार्यरत जलाशय गाळ सर्वेक्षण विभाग, नाशिक व सुदूर संवदेन व भूमाहिती शास्त्र विभाग या दोन विभागांचे एकत्रिकरण करुन संपदा अभियांत्रिकी केंद्र (Resources Engineering Center) म्हणून कार्यरत राहिल. सदर Resources Engineering Center हे सध्या कार्यरत कार्यकारी अभियंता, जलाशय गाळ सर्वेक्षण विभाग, नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहिल. सदर केंद्र जलसंपदा विभागाशी निगडीत Remote Sensing व GIS Application विकसीत करण्याचे काम करेल. कार्यकारी अभियंता, सुदूर संवेदन व भूमाहिती शास्त्र हे पद कार्यकारी अभियंता राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीकडे वर्ग करण्यात येत आहे. सदर केंद्र अधीक्षक अभियंता, मेरी, नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहिल.

८) सध्या कार्यरत सामुग्री चाचणी विभाग व मृदू चाचणी विभाग हे विभाग अधीक्षक अभियंता,मेरी यांचे नियंत्रणाखालीच कार्यरत राहतील. सदर चाचणी विभाग रेफरल प्रयोगशाळा म्हणून कार्यरत राहतील. तसेच सदर विभाग सध्याचे कामाव्यतिरिक्त बाजारात उपलब्ध होणा-या नावीन्यपूर्ण बांधकाम साहित्यांची चाचणी करुन क्षेत्रीय गरजेनुसार सुयोग्य बांधकाम साहित्याची शिफारस करण्याचेही काम करेल.

९) अधीक्षक अभियंता,मेरी,नाशिक अंतर्गत भूकंप आधार सामुग्री पृथ:करण विभाग हा स्थापत्य बांधकामे परिरक्षण विभाग म्हणून कार्यरत राहील. हा विभाग मेरी परिसरातील जलसंपदा विभागाचे इमारती व मालमत्तेचे परिरक्षण, देखभाल-दुरुस्तीचे काम पाहील.

१०) मुख्य अभियंता, संकल्पन, मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान, अधीक्षक अभियंता, मेरी तसेच अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी हे सर्व अधिकारी महासंचालक, मेरी, नाशिक यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहतील.

११) सदर शासन निर्णय हा संदर्भ (१) नुसार जलसंपदा विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार व संदर्भ (२) मधील शासन निर्णय अधिक्रमित करुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर निर्णयामुळे वित्तीय भारात वाढ होत नाही.

१२) सदर आदेश दि.१ एप्रिल २०१५ पासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०११४१९११५९५५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र** : परिशिष्ट - १.

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2015.01.14 19:22:01 +05'30'

**( र.रा. शुक्ला )**

**शासनाचे उप सचिव.**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
६. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण,मुंबई.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१४. महासंचालक, मेरी, नाशिक
१५. महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद
१६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१७. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१८. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१९. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२०. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२१. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
२२. मुख्य अभियंता, यांत्रिकी, जलसंपदा विभाग, नाशिक
२३. मुख्य अभियंता, जलविद्यूत प्रकल्प (विद्यूत), मुंबई
२४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद /नागपूर /अमरावती / पुणे / कोकण विभाग / मुंबई /उत्तर महाराष्ट्र विभाग, नाशिक / तापी पाटबंधारे विभाग, जळगांव
२५. मुख्य अभियंता, लाभक्षेत्र विकास, औरंगाबाद
२६. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जल विकास केंद्र, औरंगाबाद
२७. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर
२८. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, अमरावती
२९. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे
३०. मुख्य अभियंता (द व प्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३२. मुख्य अभियंता (कृपातंल) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३३. मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक.
३५. मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत, पुणे.
३६. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३७. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे

३९. अधीक्षक अभियंता, (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सीडीओ), नाशिक.
४०. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
४१. अधीक्षक अभियंता, (व्दारे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४२. अधीक्षक अभियंता, (दगडी धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४३. अधीक्षक अभियंता, (विदयुत गृहे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४४. कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
४५. कोयना (वि.व.यां) संकल्पचित्र मंडळ, पुणे
४६. महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
४७. अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, (DSO) नाशिक.
४८. जलनियोजन विभाग, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४९. जलगती संशोधन विभाग क्र.१, नाशिक
५०. भुकंप उपकरणे कक्ष व भुकंप आधार सामुग्री पृथ:करण कक्ष, नाशिक.
५१. संरचनात्मक संशोधन व पदार्थ विज्ञान विभाग, नाशिक.
५२. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, पुणे
५३. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर.
५४. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद.
५५. गाळ सर्वेक्षण विभाग, नाशिक.
५६. सुदूर संवेदन व भूमाहिती शास्त्र विभाग, नाशिक.
५७. सामुग्री चाचणी विभाग व मृदू चाचणी विभाग, मेरी, नाशिक.
५८. भुकंप आधार सामुग्री पृथ:करण विभाग, मेरी, नाशिक.
५९. उपकरणे संशोधन विभाग, मेरी, नाशिक
६०. अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ,नाशिक
६१. सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६२. जलसंपदा (धोरण) कार्यासन (संग्रहार्थ).

**परिशिष्ट - १**

**शासन निर्णय क्र. मेरीबै-०११५/प्र.क्र.०१/२०१५/जसं(धोरण), दि. १४ जानेवारी, २०१५ सोबतचे विवरणपत्र**

| | **सध्याची कार्यालयीन रचना** | | **प्रस्तावित कार्यालयीन रचना** | | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **कार्यालयाचे नाव** | **कोणत्या कार्यालयाच्या नियंत्रणा खाली आहे** | **कार्यालयाचे नाव** | **कोणत्या कार्यालयाच्या नियंत्रणाखाली राहिल** | |
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** | **६.** |
| १. | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | महासंचालक, मेरी, नाशिक | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक | महासंचालक, मेरी, नाशिक | |
| २. | अधीक्षक अभियंता, (व्दारे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, (व्दारे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक. | |
| ३. | अधीक्षक अभियंता, (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक | अधीक्षक अभियंता, (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक | |
| ४. | अधीक्षक अभियंता, (दगडी धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, (दगडी धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक | |
| ५. | अधीक्षक अभियंता, (विदयुत गृहे), | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, | अधीक्षक अभियंता (उपसा सिंचन योजना) मध्यवर्ती | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक | संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | संघटना, नाशिक | |
| ६. | कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत, पुणे. | अधीक्षक अभियंता (विदयुत गृहे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), पुणे. | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक. | |
| ७. | महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक | महासंचालक, मेरी, नाशिक | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक. | महासंचालक, मेरी, नाशिक | |
| ८. | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, (DSO) नाशिक | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, (DSO) नाशिक | मुख्य अभियंता, (नियोजन व जलविज्ञान), नाशिक | |
| ९. | जलनियोजन विभाग, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक. | अधीक्षक अभियंता, (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक | जलनियोजन विभाग, नाशिक. | मुख्य अभियंता, (नियोजन व जलविज्ञान), नाशिक अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ, नाशिक. | |
| १०. | जलगती संशोधन विभाग क्र.१, नाशिक | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | जलगती संशोधन विभाग क्र.१, नाशिक | मुख्य अभियंता, (नियोजन व जलविज्ञान), नाशिक अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ, नाशिक. | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ११. | भुकंप उपकरणे कक्ष व भुकंप आधार सामुग्री पृथ:करण कक्ष, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक. | भुकंप उपकरणे कक्ष व भुकंप आधार सामुग्री पृथ:करण कक्ष | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता, नाशिक यांचे अंतर्गत उपकरणे संशोधन विभाग, नाशिक. | |
| १२. | संरचनात्मक संशोधन व पदार्थ विज्ञान विभाग, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | एम.आय.एस. कक्ष, नाशिक. | मुख्य अभियंता, (नियोजन व जलविज्ञान), नाशिक अंतर्गत अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ,नाशिक | |
| १३. | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत, पुणे. | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे. | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग | |
| १४. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, पुणे | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, पुणे | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे. | |
| १५. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर. | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर. | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे. | |
| १६. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद | मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद. | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे. | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १७. | गाळ सर्वेक्षण विभाग, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | (एकत्रिकरण) संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक. (कार्यकारी अभियंता, गाळ सर्वेक्षण विभाग) | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | कार्यकारी अभियंता, सुदूर संवेदन व भूमाहिती शास्त्र विभाग हे पद कार्यकारी अभियंता राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीकडे वर्ग. |
| १८. | सुदूर संवेदन व भूमाहिती शास्त्र विभाग, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | | | |
| १९. | सामुग्री चाचणी विभाग व मृदू चाचणी विभाग, मेरी, नाशिक | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक. | रेफरल प्रयोगशाळा, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | |
| २०. | भुकंप आधार सामुग्री पृथ:करण विभाग, मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक. | स्थापत्य बांधकामे परिरक्षण विभाग,मेरी, नाशिक. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक | |
| २१ | उपकरणे संशोधन विभाग, मेरी, नाशिक | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक. | उपकरणे संशोधन विभाग, नाशिक | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक | |